**परिचर्या प्रशिक्षण केंद्र, जिल्हा रुग्णालय, बीड येथे पोस्ट बेसिक डिप्लोमा इन पेडियाट्रिक नर्सिंग (Post Basic Diploma in Pediatric Nursing) १ वर्ष कालावधीच्या वार्षिक ३० विद्यार्थी प्रवेश क्षमता असणाऱ्या अभ्यासक्रमास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : नर्सिंग-२०२४/प्र.क्र.९१८/सेवा-५**
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक : २७ फेब्रुवारी, २०२५

<u>वाचा :-</u>

१. सहाय्यक संचालक (शुश्रृषा) आरोग्य सेवा, मुंबई यांचे पत्र क्र.संआसे/शुश्रृषा/कक्ष-९/टे-४/अभ्यासक्रम सुरु करणे/पीबीपेडीयाट्रीक/४३९८/२४, दि.०३.०९.२०२४

<u>प्रस्तावना :-</u>

केंद्र शासनाच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाकडून तसेच राज्य शासनाच्या सार्वजनिक आरोग्य विभागाकडून कुटुंब कल्याण कार्यक्रमातंर्गत माता मृत्यू व बाल मृत्यू दर कमी करणे तसेच माता व नवजात बालकांचे आरोग्यमान उंचावण्याकरीता विविध योजना, कार्यक्रम राबविण्यात येतात. सदर कार्यक्रमांतर्गत माता व बालकांच्या आरोग्य संबंधी बाबींवर प्रामुख्याने लक्ष केंद्रित करुन त्यासंबंधीत समुपदेशन, उपचार व प्रशिक्षण यांच्या माध्यमातून प्रशिक्षित अधिपरिचाराकंडून आरोग्य सेवा पुरविण्यात येते. सद्यस्थितीत राज्यात वैद्यकीय शिक्षण विभागांतर्गत २० विद्यार्थी प्रवेश क्षमतेचे पोस्ट बेसिक डिप्लोमा इन पेडियाट्रीक अभ्यासक्रम परिचर्या शिक्षण संस्था, जे.जे.रुग्णालय, मुंबई येथे सुरु असून त्यामधील केवळ ५ जागा आरोग्य सेवा आयुक्तालयाकरीता राखीव आहेत. परिणामी, आरोग्य विभागात आरोग्य सेवा पुरविण्यासाठी पुरेशा बालरोगतज्ञ परिचारिका उपलब्ध होत नाहीत. परिणामी बालरोग तज्ञ परिचारिकांची अनेक पदे दीर्घकाळ रिक्त आहेत. त्यामुळे आरोग्य विभागामध्ये बालरोग तज्ञ परिचारिका प्रशिक्षण अभ्यासक्रम सुरु करुन त्यामार्फत प्रशिक्षित बालरोग तज्ञ परिचारिका तयार करण्यानुषंगाने परिचर्या प्रशिक्षण केंद्र, जिल्हा रुग्णालय, बीड येथे पोस्ट बेसिक डिप्लोमा इन पेडियाट्रिक नर्सिंग (Post Basic Diploma in Pediatric Nursing) हा अभ्यासक्रम सुरु करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे:-

**शासन निर्णय :-**

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिपत्याखालील परिचर्या प्रशिक्षण केंद्र, जिल्हा रुग्णालय, जि.बीड येथे पोस्ट बेसिक डिप्लोमा इन पेडियाट्रिक नर्सिंग (Post Basic Diploma in Pediatric Nursing) हा अभ्यासक्रम सुरु करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. सदर अभ्यासक्रमाबाबतचा तपशिल पुढीलप्रमाणे:-

**अभ्यासक्रमांबाबतचा तपशिल:-**

| | | |
|---|---|---|
| १ | अभ्यासक्रमाचे नाव | Post Basic Diploma in Pediatric Nursing |
| २ | प्रशिक्षण कालावधी | १ वर्ष |
| ३ | प्रवेश क्षमता | ३० विद्यार्थी प्रती वर्षी |
| ४ | प्रवेशाकरीता पात्रता | जीएनएम किंवा बीएस्सी नर्सिंग उत्तीर्ण नोंदणीकृत अधिपरीचारीका |

२. सदर अभ्यासक्रमासाठी पहिल्या टप्प्यात केवळ सार्वजनिक आरोग्य विभागात कार्यरत अधिपरिचारीकांनाच संस्थास्तरावर प्रवेश देऊन प्रशिक्षित करण्यात यावे. तद्नंतर दुसऱ्या टप्प्यात आवश्यकतेनुसार इतर उमेदवारांना सीईटीमार्फत प्रवेश देण्याबाबत विचार करण्यात यावा.

३. परिचर्या प्रशिक्षण केंद्र, जिल्हा रुग्णालय, जि.बीड येथे पोस्ट बेसिक डिप्लोमा इन पेडियाट्रिक नर्सिंग हा अभ्यासक्रम सुरु करण्यासाठी लागणारा खर्च व इतर खर्च हा उमेदवारांकडून जमा होणाऱ्या शैक्षणिक शुल्कातून भागविण्यात यावा.

४. सदर अभ्यासक्रमासाठी भारतीय शुश्रृषा परिषद / महाराष्ट्र शुश्रृषा परिषद व महाराष्ट्र शुश्रृषा मंडळाने वेळोवेळी विहित केलेले नियम लागू राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२२७१४४४१३३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL MAHADEV KUMERIYE

Digitally signed by ANIL MAHADEV KUMERIYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=7de2c699c260e8b545f2736f6acef82da11a2da0a6556 5e5bcb99995bc112fe6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C4770170FA4EC3BAEC96D0FA6B787BC469606 39B94799F693E5F126CA6F1AF70, cn=ANIL MAHADEV KUMERIYE
Date: 2025.02.27 14:45:33 +05'30'

**(अनिल कुमेरीये)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई

२) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय,मुंबई
३) संचालक, आरोग्य सेवा-१, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
४) संचालक, आरोग्य सेवा-२, आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
५) उपसंचालक (शुश्रृषा) आरोग्य सेवा, मुंबई.
६) उपसंचालक , आरोग्य सेवा, छत्रपती संभाजीनगर मंडळ, छत्रपती संभाजीनगर
७) सहाय्यक संचालक (शुश्रृषा) आरोग्य सेवा, मुंबई.
८) जिल्हा शल्यचिकित्सक, जिल्हा रुग्णालय, बीड
९) प्राचार्य, परिचर्या प्रशिक्षण केंद्र, जिल्हा रुग्णालय, बीड
१०) मा.मंत्री,(सा.आ. व कु. क.) यांचे खाजगी सचिव
११) मा.राज्यमंत्री,(सा.आ. व कु. क.) यांचे खाजगी सचिव
१२) सचिव-१, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
१३) सचिव-२, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
१४) सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
१५) निवडनस्ती (सेवा-५)